**संगणकावर गेम्स व पायरेटेड**
**आज्ञावल्या स्थापित न करण्याबाबत..**

# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग, माहिती तंत्रज्ञान संचालनालय
परिपत्रक क्रमांक : सीओएम२००२/प्रक्र.२५४/०५/३९
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २६ एप्रिल, २००५.

वाचा -१) परिपत्रक क्रमांक सीओएम २००१/प्रक्र.१५२/३९ दि. ५.०३.२००२
२) सीओएम २००२/प्रक्र २५४/०२/३९, दि. १४ जुलै, २००३

## परिपत्रक

शासकीय कामकाजात गतिमानता आणण्यासाठी संगणकीकरण करण्याच्या उद्देशाने मंत्रालयीन विभागांना तसेच त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयांना संगणक उपलब्ध करुन देण्यात आले आहेत. संगणकाचा वापर फक्त शासकीय कामकाज करण्यासाठी करणे अपेक्षित आहे. मंत्रालय व नवीन प्रशासकीय भवनात एकूण ३५०० संगणक सध्या लॅनद्वारे जोडण्यात आले आहेत. सदर कार्यालयीन कामकाजासाठी स्थापित संगणकावर बरेच गेम्स स्थापित केलेले आढळुन येत आहेत. तसेच कार्यालयीन वेळेत संगणकीय गेम्स खेळले जात असल्याबाबत सध्या सुरु असलेल्या विधानमंडळाच्या अधिवेशनात औचित्याचा मुद्दाही उपस्थित झाला आहे. तेव्हा विभाग व विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयांमध्ये संगणक हाताळणी करताना खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे:-

१) संगणकावर गेम्स खेळु नयेत. संगणकावर गेम्स खेळताना निदर्शनास आल्यास संबंधितांविरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात यावी.
२) अनधिकृत गेम्स, स्क्रीन सेव्हर्स तातडीने काढुन टाकण्यात यावेत.

याबाबत माहिती तंत्रज्ञान संचालनालयामार्फत कार्यालयीन संगणक वापराबाबत मार्गदर्शक तत्वे उपरोक्त संदर्भाधीन दोन परिपत्रकान्वये निर्गमित केली असुन संगणक वापरणा-या सर्व अधिकारी / कर्मचा-यांनी त्यांचे अवलोकन व काटेकोरपणे पालन करावे.

तसेच विविध पायरेटेड सॉफ्टवेअर / गेम्स स्थापित करताना वापरण्यात येणाऱ्या फ्लॉपी / सिडीज मुळे विषाणुंचा प्रार्दुभाव वाढत असल्याचे निदर्शनास येत आहे. सदर बाब ही अतिशय गंभीर असुन यामुळे कार्यप्रणालीचा वेग मंदावत असुन ई-मंत्रा आज्ञावलींच्या परिणामकारकरित्या अंमलबजावणीवरही परिणाम होत आहे. तेव्हा कार्यालयीन संगणकाचा व

उपलब्ध ई-मंत्रा आज्ञावलीचा परिणामकारक वापर करण्यासाठी पुढे नमुद सुचनांचे काटेकोर पालन करणे अत्यंत आवश्यक आहे.

१) विभागातील संगणकावर शासनाने अधिकृत केलेली सॉफ्टवेअर्सच स्थापित केलेली असावी.
२) पायरेटेड सॉफ्टवेअर वापरणे कायद्याने गुन्हा असून संगणकावर पायरेटेड सॉफ्टवेअर फ्लॉपीज, सिडीज इत्यादिंचा वापर करु नये.
३ ) इंटरनेटसाठी दिलेले पासवर्ड व लॉगीन कृपया इतर अधिकारी / कर्मचारी यांना देवु नयेत. तसेच ते दुसऱ्याला समजणार नाहीत याची दक्षता घ्यावी.
४) इंटरनेट सुविधा प्राप्त संगणकावर अनावश्यक संकेत स्थळे पाहु नयेत
५) लॅन सुविधेसाठी जोडलेला पॅचकॉर्ड काढुन ठेवण्यात येवु नये

विभागांमध्ये वरील सूचनांचे नियमितपालन होत असल्याची पहाणी वेब को-ऑर्डीनेटर्स, डीजेएमएस ॲडमिनिस्ट्रेटर व संगणक समन्वय अधिकारी यांचेकडुन करुन घेण्यात यावी. तसेच मंत्रालयीन विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील क्षेत्रिय कार्यालयांना वरीलप्रमाणे सुचनांचे काटेकोरपणे अनुपालन करण्याबाबत आदेश द्यावेत.

प्र.दि.सोहळे

**( प्र. दि. सोहळे)**
**संचालक (मात)**

प्रति,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्यसचिव यांचे खाजगी सचिव,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
महाराष्ट्र लोकसेवा आयोग यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, (विधान परिषद / विधान सभा), मुंबई,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यालये,
निवड नस्ती (२ प्रती)